धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित / विना अनुदानित, नगरपालिका, महानगरपालिका शाळा व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजनेंतर्गत अनुदान वितरण २०१६-१७

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१६/प्र.क्र.६५/१६/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख:- ३१ मार्च, २०१७

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१०/प्र.क्र.८०/१५/का-६, दि.०७.१०.२०१५
२) शासन शुध्दीपत्रक क्रमांकः अविवि-२०१०/प्र.क्र.८०/१५/का-६, दि.०८.१०.२०१५
३) शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१६/प्र.क्र.६५/१६/का-६, दि. १७.०३.२०१७
४) जिल्हाधिकारी कार्यालय, नंदूरबार यांचे पत्र क्र.२०१७/ सा.शा./कक्ष-२/कावि-१३, दि. २७.१.२०१७.
५) जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा यांचे पत्र क्र. जिनिससा / संस/अविविउनिस/ १६-१७/ का.३/ ६०६, दि. १८.३.२०१७.
६) जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर यांचे पत्र क्र. निवि/का-१५/संस-२/अल्पसंख्यांक/ २०१७/४३२, दि. ०६.०३.२०१७
७) जिल्हाधिकारी कार्यालय, भंडारा यांचे पत्र क्र. जिनिस/भं/ सांस-१/ अल्पसंख्यांक /२७५/२०१७, दि. १०.०३.२०१७
८) जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली यांचे पत्र क्र. कक्ष-४/नियोजन/ जिवायो १६-१७/संस-२/ ६८, दि. १६.०३.२०१७.
९) जिल्हाधिकारी कार्यालय, वर्धा यांचे पत्र क्र. का-जिनिस/धार्मिक-अल्पसं/४५/२०१७, दि. २०.०३.२०१७.

**प्रस्तावना -**

धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित/विना अनुदानित शाळा, नगरपालिका शाळा,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, महानगरपालिका शाळा व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना दि.०७.१०.२०१५ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. सदरहू योजनेंतर्गत संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून शासनाकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावातील पात्र शाळांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय निवड समितीने उपरोक्त शासन निर्णयानुसार त्यांचेकडे प्राप्त अर्जांची छाननी केली असून छाननीअंती पात्र शाळांची यादी, शिफारशी व आवश्यक निधीच्या मागणीसह मंजूरीकरिता शासनाकडे पाठविली आहे. सर्व संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची दि.०७.१०.२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती नुसार शासनस्तरावर पुन:श्च छाननी करुन अपूर्ण किंवा त्रुटी असलेले प्रस्ताव अपात्र करण्यात आले

आहेत. या छाननीअंती पात्र ठरलेल्या शाळांची व त्यांस मंजूर करावयाच्या (कमाल मर्यादा प्रत्येक शाळेसाठी रू.२ लाख) अनुदानाची रक्कम खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | पात्र शाळांची संख्या | मंजूर अनुदान (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| १. | नाशिक विभाग | नंदूरबार | १९ | ३८.०० |
| २. | पुणे विभाग | सातारा | ०२ | ०४.०० |
| ३. | नागपूर विभाग | चंद्रपूर | ०१ | ०२.०० |
| | | गडचिरोली | ०१ | ०२.०० |
| | | भंडारा | ०२ | ०४.०० |
| | | **एकूण** | **२५** | **५०.००** |

उपरोक्त तक्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.५०.०० लाख इतके अनुदान या योजनेंतर्गत मंजूर करण्यात येत असून, सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना सदर निधीसाठी आहरण, संवितरण व नियत्रंक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. पात्र शाळांची नावे, मागणीचे स्वरुप, यापूर्वी अनुदानाचा लाभ घेतल्याचे वर्ष याचा तपशील या शासन निर्णया सोबतच्या सहपत्रामध्ये दर्शविण्यात आला आहे. संबंधित जिल्हाधिकारी, यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत अनुदानाचे वितरण प्रणालीतून (BDS) आहरण व संवितरण करण्यास खालील बाबींच्या पूर्ततेच्या /खातरजमा करण्याच्या अटीच्या अधीन राहून वितरण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

जिल्हाधिकारी कार्यालयाकडून शासनाकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावामध्ये एकाच DIES CODE/INSTITUTE CODE/ लायसन्स क्रमांक एकापेक्षा जास्त प्रस्ताव प्राप्त झाल्याचे तसेच एकाच इमारतीत/आवारातील एकाच संस्थेच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांसाठी एक पेक्षा जास्त प्रस्ताव प्राप्त झाल्याची बाब शासनाच्या निर्दशनास आली आहे. तथापि, दि. ०७.१०.२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार एका DIES CODE/INSTITUTE CODE/लायसन्स क्रमांकासाठी फक्त एकदाच अनुदान देण्यात येईल तसेच, एकाच इमारतीत/ आवारात एकाच संस्थेच्या प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक अशा वेगवेगळया शाळा/ महाविद्यालये हे दिवसभरातील स्वतंत्र वेळापत्रकानुसार वेग वेगळया पाळीत/ सत्रात भरत असतील आणि त्यांचे DIES CODE वेगवेगळे असतील अशा परिस्थितीत त्या इमारतीसाठी/आवारासाठी या DIES CODE पैकी फक्त एकाच DIES CODE साठी अनुदान मंजूर करण्यात येईल. संबंधित जिल्हाधिकारी यांनी अनुदान वितरण करण्यापूर्वी शासन निर्णय दि. ७.१०.२०१५ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन होईल याची दक्षता घ्यावी.

या योजनेंतर्गत शाळांना चालू वर्षात ज्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी संबंधित शाळांनी निधी खर्ची टाकावा.

शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग व नगरपालिका शाळांना अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग व नगरपालिका शाळांनी अनुदान प्रत्यक्ष प्राप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व त्यानंतर अनुदानाच्या विनियोगाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सादर करणे बंधनकारक आहे. सर्व संबंधित शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग व नगरपालिका शाळांकडून प्राप्त झालेल्या उपयोगिता प्रमाणपत्रांचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावा. तसेच त्यांनी नियंत्रण अधिकारी म्हणून शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.एयुडी-१०८२/सीआर-९०/८४/कोष-५, दि.२४ सप्टेंबर, १९८६ नुसार सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ घालून

त्यासंबंधीचे प्रमाणपत्र व सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचा संबंधीत लेखा शिर्षाचा विनियोजन लेखा अहवाल दि.३० सप्टेंबर, २०१७ पर्यंत शासनास निश्चितपणे सादर करावा.

या योजनेंतर्गत उद्भवणाऱ्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील शासन निर्णय दि.०७.१०.२०१५ मध्ये नमूद उच्चस्तरीय निवड समितीस प्राधिकृत करण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, प्रधान लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२१) अल्पसंख्यांक शाळांना पायाभूत सुविधा पुरविणे करिता सहायक अनुदान (२२३५ ए-३४७) ३१ सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम दि.१५.०५.२००९, अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत/विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. या निधी वितरणासाठी शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ मधील अटींची पूर्तता होत आहे. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७ अन्वये या योजनेकरीता रु. २४.०० कोटी निधी दिनांक ३१.३.२०१७ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध आहे. या तरतुदीतून चालू आर्थिक वर्षासाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार निधी वितरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११२२४००८४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=39e858554371a26f6672b036224cff0a48a63a836a4067a8da9a8cca6d83429e, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2017.03.31 13:23:17 +05'30'

( सं. छ. तडवी )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
७. महालेखापाल ½ (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
८. जिल्हाधिकारी, नंदूरबार, सातारा, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार, सातारा, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदूरबार, सातारा, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली.
११. जिल्हा नियोजन अधिकारी, नंदूरबार, सातारा, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली.

१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदूरबार, सातारा, भंडारा, चंद्रपूर व गडचिरोली.

१३. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१४.सर्व संबंधित शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था व अपंग व नगरपालिका शाळा (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)

१५.निवडनस्ती.

**धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित / विना अनुदानित, नगरपालिका, मका शाळा व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना शासन निर्णय क्रमांक अविवि-२०१६/प्र.क्र.६५/१६/का-६ दि. ३१.०३.२०१७ चे सहपत्र**

| अ.क्र. | नाशिक विभाग-- जिल्हा-नंदूरबार | | |
|---|---|---|---|
| | संस्थेचे नाव व शाळेचे नाव | प्रयोजन | अनुदानाचे वर्ष |
| १. | नगर पालीका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १४ नंदूरबार, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, ग्रंथालय कपाट, संगणक-२, खुर्ची-३, बेंचेंस-४ व कॉम्प्युटर ट्रे-२ | २ |
| .२ | नगर पालीका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ११ नंदूरबार, जि. नंदूरबार. | लॅपटॉप-२, स्टील कपाट-१, डेक्स-११, संगणक टेबल-३, माईक/एम्प्लीफायर-१ इ. | २ |
| .३ | मौलाना अब्दुल कलाम आझाद नंदूरबार द्वारे संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ०५ नंदूरबार, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, ग्रंथालय कपाट-१ , संगणक-१, खुर्ची-३, बेंचेंस-५ व संगणक टेबल-२, तसेच इन्व्हेर्टर १ नग | २ |
| .४ | डॉ. झाकीर हुसेन नंदूरबार द्वारे संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १७, नंदूरबार, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, संगणक-१, ऑलइन प्रिंटर्स, बेंचेंस-१४ व संगणक टेबल-१ नग इ. | २ |
| .५ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ०२ , नंदूरबार, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, ग्रंथालय कपाट-१, स्टील कपाट-२, ऑलइन प्रिंटर्स, संगणक टेबल-३, खुर्ची-३, इनव्हर्टर-इ १ , स्वॉप्टवेअर ३,इ. | २ |
| .६ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १९ , नंदूरबार, जि. नंदूरबार. | संगणक संख्यां-२, लॅपटॉप-१, ऑलइन प्रिंटर्स-१, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१ , संगणक टेबल-१, खुर्ची- १, इ. | १ |
| .७ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १२ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर संगणक संख्यां-२, ऑलइन प्रिंटर्स-, ऑफीस टेबल-२, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१ , | १ |
| .८ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १५ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर संगणक संख्यां-१, , ऑलइन प्रिंटर्स-१, बेंच-३, इन्व्हर्टर- १, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१ , | १ |
| .९ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ०४ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, लॅपटॉप-२, खुर्ची-१, कलर प्रिंटर्स-१, स्वॉप्टवेअर-२, बेंच-१, सी.सी.टी.व्ही.कॅमेरा-२, पेनड्राईव्ह | १ |
| .१० | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ०२ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर-१, लॅपटॉप-२, ऑलइन प्रिंटर्स-१, खुर्ची-१, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१ , | १ |
| .११ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. ०६ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर-१, लॅपटॉप-२, ऑलइन प्रिंटर्स-, खुर्ची-१, एल.सी.डी. प्रोजेक्टर . | १ |
| .१२ | नगर पालिका शिक्षण मंडळ नंदूरबार द्वारे, संचालित नगरपालिका उर्दु प्राथमिक शाळा क्र. १४ , शहादा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर, लॅपटॉप-२, ऑलइन प्रिंटर्स, बेंच-१, antvirus- १, एल.सी.डी. प्रोजेक्टर . | १ |
| .१३ | निशांत वेलफेअर अॅन्ड एज्युकेशन सोसायटी, कुकडेल , ता. शहादा, जि. नंदूरबार, द्वारे, संचालित निशांत ज्युनियर कॉलेज अॅन्ड सायन्स कुकडेल, ता. शहादा, जि. नंदूरबार. | Softwar antvirus- ३, बेंच-५, झेरॉक्स मशिन-१, एल.सी.डी. प्रोजेक्टर -१ इ. | ५ |
| .१४ | अशरफ भाई मजिदभाई लखाणी अल्पसंख्यांक बहुउद्देशिय संस्था, नवापूर, जि. नंदूरबार, द्वारे, संचालित गुजराथी माध्यमिक विद्यालय, नवापूर, जि. नंदूरबार. | स्वच्छतागृह बांधणे, ऑनलाईन प्रिंटर्स-१, संगणक स्वॉप्टवेअर , ई- लरनिंग लॅग्वेज लॅब-१, इ. | ३ |
| .१५ | यहा मोगी देवी शिक्षण संस्था नागसर, ता.जि. नंदूरबार, द्वारे, संचालित उर्दु माध्यमिक विद्यालय, खापर, ता. अक्कलकुवा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर-१, संगणक-१ लॅपटॉप-१, ऑलइन प्रिंटर्स- १, बेंच-१, Softwar antvirus-२, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१ इ. | ५ |
| .१६ | यहा मोगी देवी शिक्षण संस्था नागसर, ता.जि. नंदूरबार, द्वारे, संचालित उर्दु हायस्कुल म्हसावद, ता. शहादा, जि. नंदूरबार. | प्रयोगशाळा अद्ययावत करणे, लॅपटॉप-१, ऑलइन प्रिंटर्स-१, बेंच-३, एल.सी.डी. प्रोजेक्टर-१, इन्व्हेर्टर-१, खुर्ची-१ , Softwar antvirus- १ इ. | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| .१७ | भारत विविध विधायक कार्य समिती तळोदा, .जि. नंदूरबार, द्वारे, संचालित नँशनल हायस्कुल तळोदा, ता. तळोदा, जि. नंदूरबार. | खेळ साहीत्य, बेंच-८, झेराँक्स मशिन-१, Softwar antvirus- ३, इ. | ५ |
| .१८ | जामिया इस्लामिया इशातूल उलुम अक्कलकुवा, जि. नंदूरबार, द्वारे, संचालित जामिया औद्योगिक प्रशिक्षण संस्था, अक्कलकुवा, जि. नंदूरबार. | कुलर फिल्टर-१, इन्व्हेर्टर बँटरी § ३ नग, व फिटींग चार्जेस इ. | ३ |
| .१९ | जामिया इस्लामिया इशातूल उलुम अक्कलकुवा, ता. अक्कलकुवा, जि. नंदूरबार, द्वारे, संचालित मौलाना अब्दुल कलाम आझाद रेसीडेन्सी ज्युनियर काँलेज, अक्कलकुवा, जि. नंदूरबार. | बेंच-१३, झेराँक्स मशिन-१, इ. | ३ |
| | **पुणे विभाग- जिल्हा- सातारा** | | |
| .१ | कराड शिक्षण मंडळ, कराड, ता. कराड, जि. सातारा, संचालित नगर परिषद शाळा क्रमांक-५, ता. कराड, जि. सातारा | शाळा खोल्यांची डागडुजी करीता | १ |
| .२ | दारूल उल्लुम झकारीया , कोडंवे, ता. जि. सातारा, संचालित झकारीया उर्दु स्कुल, कोंडवे, ता.जि. सातारा. | संगणक कक्ष उभारणे. | ५ |
| | **नागपूर विभाग- जिल्हा-भंडारा.** | | |
| .१ | नगर परिषद भंडारा, संचालित न.प. डॉ. झाकीर हुसेन उर्दु प्राथमिक शाळा, महल वार्ड, भंडारा, जि. भंडारा. | पिण्याच्या पाण्याची सुविधा, कुलर, फिल्टरसह, संगणक, प्रिंटर्स, स्वच्छतागह दुरूस्ती,एल.सी.डी. प्रोजेक्टर इ. | १ |
| .२ | नगर परिषद गांधी चौक, भंडारा, संचालित मौलाना अब्दुल कलाम आझाद प्राथमिक आणि उच्च प्रा.शाळा, न.प. भंडारा, जि. भंडारा. | पिण्याच्या पाण्याची सुविधा, कुलर, फिल्टरसह, प्रयोगशाळा उभारणे,पिंटर्स, बेंचेंस,डेस्क, टेबल खरेदी. इ. | १ |
| | **नागपूर विभाग- जिल्हा- चंद्रपूर.** | | |
| .१ | रफी अहमद किडवाई मे. एज्युकेशन सोसायटी, चंद्रपूर, संचालित रफी अहमद किडवाई मे. हायस्कुल व कनिष्ठ महाविद्यालय, घुटकाला वार्ड, चंद्रपूर, जि. चंद्रपूर. | नवीन स्वच्छतागृह बांधणे व दुरूस्ती | ५ |
| | **नागपूर विभाग- जिल्हा- गडचिरोली** | | |
| .१ | ग्रामीण शैक्षणिक व सांस्कृतीक विकास मंडळ, चार्मोशी, जि. गडचिरोली, संचालित नवजीवन नर्सीग स्कुल, चार्मोशी, जि. गडचिरोली, तीसील ऑफीसजवळ, हनुमान वार्ड क्र. १, मु. पो. चार्मोशी, जि. गडचिरोली. | शैक्षणिक साहीत्य, किटस खरेदी. | १ |
| | | | |